**मौजे. बिलाखेड, ता. चाळीसगांव, जि. जळगांव येथील आयुक्त (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य यांच्या नावे असलेल्या जागेपैकी ९.८१ हे. जमिन महसूल विभागास प्रत्यार्पित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: पविआ-१०२४/प्र.क्र. ७८/पदु -३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
दिनांक : १८ जूलै, २०२४.

**वाचा :-**
१. आयुक्त पशुसंवर्धन यांचे जा.क्र. पशुधन-३/प्र.क्र.१७५ भाग-३/पसं-१३/४८१९/२०२४, पुणे-६७, दिनांक २२.४.२०२४ रोजीचे पत्र
२. जिल्हाधिकारी, जळगाव यांचे क्र. जमिन-३/२८/ई-ऑफिस ४७६४९४/२०२४, दिनांक १४.०६.२०२४ रोजीचे पत्र
३. महसूल व वन विभागाच्या नस्ती क्र. जमिन -३२२४/प्र.क्र.९७/ज-६ (अ) वरील दिनांक ०४.०७.२०२४ रोजीची टिप्पणी.

**शासन निर्णय:-**

मौजे. बिलाखेड, ता. चाळीसगांव, जि. जळगांव येथील गट क्र. व उपविभाग २७५ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास प्रक्षेत्र विलाखेड या प्रक्षेत्राअंतर्गत ६६.११ हेक्टर जमिन मा. आयुक्त, पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य यांच्या नावे आहे. सदर प्रक्षेत्रामार्फत जळगाव, नाशिक, धुळे, नंदुरबार, या जिल्हयातील शेतकरी/मेंढपाळांना सुधारित जातीचे मेंढेनर, बोकड पैदासाठी वाटप केले जातात. तसेच शेळी मेढी पालन व्यवसायास उत्तेजन देणेसाठी दरमहा शेळी मेंढी पालन प्रशिक्षण आयोजित केले जाते.

२. मौजे. बिलाखेड, ता. चाळीसगांव, जि. जळगांव येथील आयुक्त (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य यांच्या नावे असलेल्या जागेपैकी लागवडीयोग्य नसलेली ९.८१ हे. जमिन विविध शासकीय विभागांच्या इमारती बांधकाम करण्याकरीता महसूल विभागाच्या नावे करण्याची विनंती जिल्हाधिकारी, जळगाव यांनी त्यांच्या वाचा क्र. २ येथील पत्रान्वये महसूल व वन विभागास केली आहे. त्यास अनुसरुन महसूल व वन विभागाने नस्ती क्र (अ) ६-ज/९७.क्र.प्र/३२२४- जमिन .या नस्तीवर ९.८१ हे. जमिन आयुक्त (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य यांच्या नावे असलेल्या जागेपैकी ९.८१ हे. आर. इतकी लागवडीयोग्य नसलेली पोटखराबा, नापिक जमिन जिल्हाधिकारी, जळगाव यांच्या नावे करण्याचा प्रस्ताव दिनांक ०४.०७.२०२४ रोजी या विभागास सादर केला आहे.

३. महसूल व वन विभागाकडून वरील प्रमाणे प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेऊन मौजे. बिलाखेड, ता. चाळीसगांव, जि. जळगांव येथील गट क्र. व उपविभाग २७५ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास प्रक्षेत्र विलाखेड या प्रक्षेत्राअंतर्गत ६६.११ हेक्टर जमिनीपैकी ९.८१ हे. आर. इतकी लागवडीयोग्य नसलेली पोटखराबा, नापिक जमिन विविध शासकीय विभागांच्या इमारती बांधकाम करण्याकरीता जिल्हाधिकारी, जळगाव यांच्या नावे करण्यासाठी महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.:-

१. जिल्हाधिकारी, जळगाव यांना विविध शासकीय विभागांच्या इमारती बांधकाम करण्याकरीता देण्यात येणाऱ्या जमिनीची चतु:सिमा आयुक्त पशुसंवर्धन व / व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्या उपस्थितीत व सहमतीने निश्चित करण्यात यावी.

२. जिल्हाधिकारी, जळगाव यांना ९.८१ हे. आर. जमिन देताना पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्या चालु असलेल्या प्रकल्पाच्या जैवसुरक्षेस बाधा पोहचणार नाही, यांची दक्षता घेण्यात यावी.

३. पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्या भविष्यातील प्रस्तावित प्रकल्पास बाधा येणार नाही, याचीही दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१६३९२३८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74b b051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80 796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.07.18 16:52:11 +05'30'

**(नि. भा. मराळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. जिल्हाधिकारी, जळगाव
४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
५. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव
६. प्रक्षेत्र व्यवस्थापक, मौजे. बिलाखेड, ता. चाळीसगांव, जि. जळगांव
७. निवड नस्ती- पदुम-३